

# हॉलंडचा छोटा हीरो

विलियम बार्नेट

मराठी : अश्विनी बर्वे

ही एक बहादुर मुलाची खरी गोष्ट आहे, ज्याने एक महत्वाचे काम पूर्ण केले आणि अनेक अडचणी आल्या तरी त्याने ते काम अपूर्ण सोडले नाही.

हॉलंड एक असा देश आहे जिथे अधिकतर जमीन समुद्र तळाच्या खाली आहे. केवळ मोठी दारे ज्यांना "डाइक“ म्हटले जाते, उत्तरेकडच्या समुद्राचे पाणी जमिनीवर येण्यापासून रोखतात.आणि देशाला पुरापासून वाचवतात. अनेक शतकांपासून आपला देश सुरक्षित आणि कोरडा राहावा म्हणून हॉलंडच्या लोकांनी ही दारे मजबूत ठेवण्याचे काम केले आहे. एवढंच नाही तर छोट्या मुलांना सुद्धा माहीत आहे की प्रत्येक क्षणी त्यांना "डाइक" वर नजर ठेवायला पाहिजे. मुलांना हे ही माहीत आहे की,"डाइक“ मध्ये एका बोटाचे छिद्र सुद्धां धोकादायक होऊ शकते.





कितीतरी वर्षे आधी हॉलंडमध्ये पीटर नावाचा एक मुलगा राहत होता. पीटरचे वडील त्या लोकांपैकी एक होते जे घाटावरच्या फाटकांची देखभाल करत असत. ज्यांना "स्लुइस“ म्हटले जाई. ते "स्लुइस" गेट्स उघडत आणि बंद करत म्हणजे हॉलंडची जहाजे, ओढ्यातून निघून मोठ्या समुद्रात जाऊ शकतील.

पानगळीमध्ये एका दुपारी जेव्हा पीटर आठ वर्षाचा होता, तेव्हा त्याच्या आईने त्याला बोलावले, “पीटर,“ त्याची आई म्हणाली. “मला वाटते की तुझा मित्र जो अंध आहे आणि डाईकच्या पलीकडे राहतो त्याला केक घेऊन जावा.जर तू वेगाने गेलास आणि रस्त्यात खेळत बसला नाही तर अंधार होण्याच्या आधी तू परत घरी येशील.”

छोटा मुलाला ते काम करायला आवडणार होते. पीटर पटापट त्या गरीब नेत्रहीन माणसाच्या घरी पोहचला. त्याच्याजवळ तो थोड्यावेळ थांबला आणि त्या माणसाने त्याला आपले समुद्र किनाऱ्यावरचे आपले अनुभव, सूर्य, फुले आणि समुद्रात दूर उभ्या असणाऱ्या जहाजाबाबत सांगितले. मग त्याला आपल्या आईची आठवण आली कि तिने अंधार होण्याच्या आत घरी यायला सांगितले आहे. मग पीटरने आपल्या मित्राचा निरोप घेतला आणि घराकडे निघाला.





जेव्हा तो "डाइक“ च्या किनाऱ्यावर चालत होता तेव्हा त्याने बघितले की पावसामुळे समुद्राचे पाणी खवळले होते,आणि पाण्याच्या लाटा सतत किनाऱ्यावर धडकत होती. मग त्याने आपल्या वडिलांच्या"स्लुइस" गेट्सच्या बाबत विचार केला.

“मला आनंद वाटतो की हे "डाइक“ एवढे मजबूत आहे,” तो स्वतःशी बोलला. “जर ते तुटले तर आमचे काय होईल? आमची सुंदर शेते पाण्यात बुडतील. वडील याला नेहमी “रागावलेले पाणी” म्हणत असत. मला वाटते कि एवढ्या काळ पाण्याला बाहेर ठेवल्यामुळेच ते लोकांवर नाराज आहे.”

जसजसा तो पुढे जाऊ लागला तेव्हा त्याला मधून मधून रस्त्याच्या काठावर उगवलेली निळी फुले तोडण्यासाठी तो थांबे तेव्हा त्याला सशांच्या पळण्याचा आवाज येत असे. कारण ते गवतात लपून पळत असत.जेव्हा त्याने आपल्या गरीब अंध मित्राच्या घरी जाण्याच्या प्रवासाबद्दल विचार केला तेव्हा त्याच्या चेहऱ्यावर हसू फुटले. त्या व्यक्तीजवळ खूप कमी सुख-साधने होती तरी तो नेहमी पीटरला भेटून खुश होत असे.



अचानक पीटरने बघितले सूर्य अस्ताला जात आहे आणि अंधार होऊ लागला आहे. “आई माझी वाट बघत असेल, त्याने विचार केला आणि मग तो घराकडे पळू लागला.



तेवढ्यात पीटरला एक मोठा आवाज ऐकू आला. तो वाहणाऱ्या पाण्याचा आवाज होता.तो थांबला आणि त्याने खाली बघितले "डाइक" मध्ये एक छोटे छिद्र होते, ज्यातून पाण्याची छोटी धार वाहत होती.

हॉलंडमधले प्रत्येक मुल डाइकच्या गळतीच्या विचाराने भयभीत होत असे.

पीटरला त्वरित धोका लक्षात आला,जर पाणी एका छोट्या छिद्रातून वाहू लागले, तर लवकरच ते छिद्र मोठे होईल आणि परत पूर्ण देशात पूर येईल. एका क्षणात त्याच्या लक्षात आले कि त्याने काय करायला हवे. त्याने आपल्याकडची फुले एका बाजूला फेकली आणि तो "डाइक“ च्या किनाऱ्यावर चढला आणि त्याने आपले बोट त्या छोट्याशा छिद्रात घातले.

त्याने पाणी वाहण्यापासून रोखले.

"अरे!!" तो स्वतःशी म्हणाला. “रागीट पाण्याने आत यायला नको. मी पाण्याला माझ्या बोटाच्या सहाय्याने आत येण्यापासून रोखू शकतो. जोपर्यंत मी आहे तोपर्यंत हॉलंडला बुडू देणार नाही.”

सुरुवातीला सगळं काही ठीक झालं,पण लवकरच अंधार होऊ लागला. हळूहळू थंडी वाढू लागली. छोटा पीटर ओरडला आणि ओरडत राहिला, “इकडे या! मला मदत करा” त्याने हाका मारल्या. पण कोणीही त्याचा आवाज ऐकला नाही. कोणीच त्याच्या मदतीला आले नाही.



हळूहळू रात्र आणि थंडी वाढत होती आणि त्याचा हात दुखू लागला होता. त्याचा हात बधीर झाला होता. तो परत ओरडला, “कोणी आहे का तिकडे, येईल का? आई, आई!”

त्याच्या आईने आपल्या छोट्या मुलासाठी सूर्यास्तानंतर "डाइक“ कडे अनेक वेळा बघितले,त्यानंतर तिने घराचे दार बंद केले. तिने विचार केला पीटर कदाचित आपल्या अंध मित्राबरोबरच राहणारा असेल आणि सकाळी ती त्याला चांगली रागवेन, तिची परवानगी न घेता तो घराच्या बाहेर का राहिला म्हणून?

पीटरने शिट्टी वाजवण्याचा प्रयत्न केला, पण त्याचे दात थंडीने वाजत होते. त्याने आपले बहीण भाऊ यांची उबदार पांघरुणे आणि आपले प्रिय आईबाबा यांच्याबाबत विचार केला. “मी त्यांना बुडू देणार नाही,” तो म्हणाला, “मी आज पूर्ण रात्रभर इथेच थांबेन आणि जोपर्यंत कोणतीही मदत येत नाही तोपर्यंत मी इथून हलणार नाही.”

चंद्र आणि तारयांनी समुद्राच्या किनाऱ्यावर खडकावर वाकलेल्या मुलाला बघितले. त्याचे डोके खाली वाकलेले होते आणि त्याचे डोळे बंद होते. पण तो झोपला नव्हता, तो परत परत आपला हात रगडत होता, तो नीट करत “रागीट पाण्याला“ आत येण्यापासून रोखत होता.

“मी कोणतीही अडचण सहन करेन,” त्याने विचार केला. म्हणून तो रात्रभर तिथेच उभा राहिला आणि त्याने पाण्याला बाहेर रोखले.

दुसऱ्या दिवशी जेव्हा सकाळी सकाळी कामावर जाणाऱ्या माणसाने कोणाचे तरी कण्हणे ऐकले. त्याने किनाऱ्याकडे बघितले तर एक छोटा मुलगा "डाइक“च्या किनाऱ्यावर चिकटून बसला आहे.

“काय झालं आहे? तो माणूस ओरडला. “तुला कुठे काही लागलं का?”

“मी पाण्याला आत येण्यापासून रोखले आहे!” पीटर मोठ्याने म्हणाला. “लवकर येऊन मला मदत करा आणि इतर लोकांना बोलवा.”





लवकरच अलार्म वाजला आणि लोक फावडे आणि इतर सामान घेऊन धावत आले आणि त्यांनी लगेच ते छिद्र दुरुस्त केले.

मग ते पीटरला आपल्या खांद्यावर घेऊन त्याच्या आईवडिलांच्या घरी गेले आणि लवकरच सर्व शहराला कळले की पीटरने त्या रात्री त्यांचा जीव वाचवला आहे. आजपर्यंत ते लोक हॉलंडच्या त्या शूर मुलाला विसरले नाहीत.



समाप्त